**वित्तीय अधिकार नियम पुस्तिका - १९७८, भाग-पहिला, उप विभाग- एक ते पाच मध्ये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमध्ये नव्याने समाविष्ट - वित्तीय अधिकाराबाबत -**

-----------------------------------------------

**भाग-पहिला, उप विभाग - दोन, अनुक्रमांक - ११ - अ**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक : विअप्र - १०.०४ / प्र.क्र. २ / २००४ / विनियम**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक : २६ फेब्रुवारी, २००४**

**वाचा :-** शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक - विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनिमय, दिनांक ११.७.२००१

## शासन निर्णय

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : विअप्र-१०००/प्र.क्र.४६/ २००१/ विनियम, दिनांक ११ जुलै, २००१ नुसार राज्य शासनाचे प्रशासनिक विभाग प्रमुख, प्रशासनिक विभागातर्गत विभाग प्रमुख, क्षेत्रिय विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांना वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. सदर वित्तीय अधिकार नियमपुस्तिका - १९७८, भाग-पहिला, उप विभाग - एक ते पाच पैकी प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमध्ये **नव्याने** वित्तीय शक्तींचा समावेश करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ११ जुलै २००१ अन्वये सुधारित केलेल्या वित्तीय अधिकार नियमावली, १९७८ मधील अधिकारात भाग-पहिला -

**उप विभाग - दोन** : मध्ये अनुक्रमांक ११ - अ नव्याने समाविष्ट करण्यात येत असून शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टात नमूद केल्याप्रमाणे राज्य शासनाचे प्रशासनिक विभाग प्रमुख, प्रशासनिक विभागांतर्गत विभाग प्रमुख, क्षेत्रिय विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांना वित्तीय अधिकार प्रदान करण्यात येत आहेत.

३. हया आदेशान्वये प्रदान केलेल्या शक्तींचा वापर हा अर्थसंकल्पीय तरतूद आणि वित्तीय प्रकाशने, नियम व विनियमन हयामध्ये समाविष्ट केलेल्या किंवा अंमलात असलेल्या आदेशांस अधीन राहील.

४. ज्या प्रशासकीय विभागांना, विभाग प्रमुखांना व इतर प्राधिकाऱ्यांना वेळोवेळी अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत, जेथे एखाद्या अधिकाऱ्याचे असे विद्यमान अधिकार वित्तीय मर्यादेच्या किंवा इतर कोणत्याही शक्तींच्या दृष्टीने अधिक उदार असतील तेथे, असे अधिकार ज्या शर्तींच्या अधीन प्रदान करण्यात आले असतील त्या शर्तींच्या अधीन ते अधिकार यापुढेही अंमलात राहतील असे मानले जाईल.

५. ज्या प्रशासनिक विभागांना, विभाग प्रमुखांना व इतर प्राधिकाऱ्यांना वेळोवेळी अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत त्यांनी अशाप्रकारे त्यांना प्रदान करण्यात केलेल्या अधिकारांचा सर्व स्तरांवर कोणताही हस्तक्षेप, भिती अथवा अनुग्रह याशिवाय त्याचा पूर्णपणे व परिणामकारक वापर करण्यात येत असल्याची खात्री करुन घ्यावी.

६.  वित्तीय अधिकार नियमपुस्तिका - १९७८, भाग-पहिला आणि संबंधित नियम यामध्ये जेथे सुधारणा आवश्यक आहेत, अशा आवश्यक सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(अं.ज.खानविलकर)**
**कार्यासन अधिकारी, वित्त विभाग**

**सहपत्र - परिशिष्ट**

**प्रति,**

* १. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१,
महाराष्ट्र,मुंबई ४०० ०२०
* २. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१,
महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०
* ३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२,
महाराष्ट्र, नागपूर
* महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र,
४. नागपूर
राज्यपालांचे सचिव
५. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
६. उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव
७. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
८. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे
९. अतिरिक्त मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई
१०. ४०० ०५१
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१३. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,
१४. कोकणभवन, नवी मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
* १५. प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),
* १६. मुंबई
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,
१७. कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय
आवार, मुंबई
प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ
* १८. सचिवालय, मुंबई
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* १९. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त
२०. यांचेकार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई

* २१. प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई ४०० ०५१
२२. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग,कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे/ नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती
२३. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा,कोकण विभाग, नवी मुंबई/ पुणे/ नागपूर/ औरंगाबाद/नाशिक/ अमरावती
२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२५. सर्व उप कोषागार अधिकारी
२६. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख
२७. सहकार व वस्त्रोद्योग विभाग (कार्यासन -हाऊसिंग सेल, १९ -सी ),मंत्रालय, मुंबई - ३२
२८. सर्व विभागीय आयुक्त
२९. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३०. सर्व जिल्हाधिकारी
३१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
३२. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी
३३. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१
३४. संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११०००१
३५. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३६. निवड नस्ती, कार्यासन - विनियम, वित्त विभाग

* पत्राद्वारे.

[शासन निर्णय , वित्त विभाग, क्रमांक : विअप्र - १०.०४ / प्र.क्र. २ / २००४ / विनियम , दिनांक २६ फेब्रुवारी, २००४ चे परिशिष्ट ]

# वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८

## ***भाग-पहिला***

### उप- विभाग-- दोन

महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ अन्वये प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार

भाग-पहिला, उप-विभाग-- दोन

| अनु-क्रमांक | नियम क्रमांक | वित्तीय शक्तीचे वर्णन | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी | प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांची मर्यादा | अटी |
|---|---|---|---|---|---|
| ११ - अ | ३४ | अधिदान लेखा कार्यालय / कोषागार यामधून संक्षिप्त देयकावर रक्कम काढण्यासाठी मंजूरी देणे. | १) प्रशासनिक विभाग<br>२) विभाग प्रमुख<br>३) प्रादेशिक कार्यालय प्रमुख<br>४) कार्यालय प्रमुख | १) रु. ५०,०००/- पर्यंत<br>२) रु.५०,०००/- पर्यंत<br>२) रु.२५,०००/- पर्यंत<br>४) रु.१०,०००/- पर्यंत | १) खर्चाला मंजूरी देण्यासंबंधीचे अधिकार वित्तीय प्राधिकाऱ्यांना असले तरच संक्षिप्त देयकावर रक्कम काढता येईल.<br>२) खर्च मंजूर अनुदानातून परंतु वित्तीय कपातीनंतर उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतूनच भागविण्यात यावा.<br>३) या वित्तीय शक्तीचा वापर करुन वेतन व भत्ते याकरीता संक्षिप्त देयके सादर करता येणार नाहीत.<br>४) काटकसरीच्या आदेशांचे अनुपालन करण्यात यावे.<br>५) कोणत्याही परिस्थितीत संबंधित कार्यालयाच्या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांकडे सहा महिन्यापूर्वी काढलेल्या एकाही संक्षिप्त देयकाचे तपशीलवार देयक लेखापरिक्षकांना सादर करण्याचे प्रलंबित असू नये.<br>६) संक्षिप्त देयकावर रक्कम काढण्यासाठी कार्यालाकडून ज्ञापन / आदेश काढण्यात यावा व त्यामध्ये ज्या बाबींसाठी रक्कम काढावयाची आहे, त्यामध्ये पुढील बाबींचा उल्लेख करण्यात यावा.<br>अ) या कार्यालयाकडे एकही संक्षिप्त देयकाचे तपशीलवार देयक लेखा परिक्षकांना सादर करण्याचे प्रलंबित नाही.<br>ब) या ज्ञापनान्वये काढण्यात येणाऱ्या संक्षिप्त देयकाचे तपशीलवार देयक विहित कालावधीत सादर करण्यात येईल.<br>७) मंजूरी प्राधिकाऱ्याला सदर खर्चाच्या बाबींसाठी प्राप्त झालेल्या वित्तीय शक्तीचा उल्लेख मंजूरी ज्ञापनात / आदेशात करण्यात यावा, जसे " वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग-पहिला, उप विभाग - (*क्रमांक लिहिणे* ), अनुक्रमांक - (*क्रमांक लिहिणे*), नियम / परिच्छेद क्रमांक ( *नियमपुस्तिकेच्या नावासह लिहिणे* ) (*शा.नि.,--- विभाग, क्रमांक ---------, दिनांक --------- लिहिणे )* "<br>८) संक्षिप्त देयकावर काढलेल्या रक्कमेतून खरेदी करावयाची असल्यास तत्संबंधीची पूर्व तयारी केलेली असावी. (उदा. निविदा, करारपत्रे अंतिम करणे इत्यादी )<br>९) या शक्ती समोरील इतर सर्व अटी व्यतिरिक्त संक्षिप्त देयकावर रक्कम काढण्याची विहित कार्यपध्दती तशीच राहील. |